पुणे - मुंबई रस्ता रुंदीकरणामुळे बाधित होणाऱ्या निगडी येथील हजरत ईस्माईल शाह दरगाह और नुरानी मस्जिद अतिरिक्त जागा देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र.पीसीएन ३००६/२१५१/प्र.क्र. ३९१ /०६ /नवि-२२

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : ६ मे, २०१०

वाचा:- १) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण,निगडी यांचे पत्र क्र.विप्र/विभाग-२/७६६२,दि.२१.९.२००६ व त्यासोबतचे मस्जिद ट्रस्टचे मागणीपत्र, सीईओंचे विषयपत्र, प्राधिकरणाचा ठराव, जागेचा नकाशा.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण,निगडी यांचे पत्र क्र.विप्र/विभाग-१/२०९८,दि.२.५.२००९

३) याविभागाचे पत्र क्र.पीसीएन ३०२००५/२७३६/प्र.क्र.२०२/०५/नवि-२२, दि.२३.९.२००५.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण,निगडी यांचे पत्र क्र.विप्रा/विभाग-२/६८८,दि.२८.११.२००५

<u>प्रस्तावना -</u> पिंपरी-चिंचवड शहर महानगरपालिकेच्या हद्दीत मौजे निगडी येथील मुंबई -पुणे रस्ता रुंदीकरणासाठी निगडी येथील दर्गा व मशिद बाधीत झालेली आहे व ठिकाणी सदर मस्जिद व दर्ग्याचे १८७.०० चौ.मी. क्षेत्र शिल्लक आहे. त्यावर मशिदीच्या पाडलेल्या इमारतीचा काही भाग उभा आहे. पिंपरी चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाने शासनास पत्र क्र.विप्र/विभाग-२/५३८५,दि.२५.७.२००५ अन्वये मशिदीसाठी पर्यायी जागा देण्याकरिता प्रस्ताव सादर केला होता. त्यानुसार शासनाच्या संदर्भाधीन क्र.३ येथे नमूद दि.२३.९.२००५ रोजीच्या पत्रान्वये प्राधिकरणाचे भूवाटप नियम १९७३ च्या नियम ११ भाग-५ नुसार मुंबई-पुणे रस्ता रुंदीकरणामुळे बाधीत होणा-या निगडी येथील मशिदीच्या पुनर्वसनासाठी प्राधिकरण क्षेत्रातील पर्यायी ५ गुंठे जागा देण्यास मान्यता दिलेली आहे. उक्त शासन मान्यतेप्रमाणे प्राधिकरणाने पेठ क्र.२४ मधील सब डिस्ट्रीक सेंटर मधील (public utility) आरक्षित ५०० चौ.मी. पर्यायी जागा मशिदीला दिली आहे. सदर पेठेतील निवासी जागेच्या ५०% म्हणजे रु.१२८२ प्रति चौ.मी. या दराप्रमाणे एकूण अधिमूल्य रु. रु.६,४१,०००/- घेवून ही जागा दिली आहे. आता मशिदीच्या विश्वस्तांनी वरील जागेव्यतिरिक्त या जागेशेजारील आणखी १० गुंठे अतिरिक्त जमिनीची प्राधिकरणाकडे मागणी केली आहे.

मशिदीच्या अतिरिक्त जागा मागणीच्या अनुषंगाने प्राधिकरण सभा क्र.२६५, दि.२४.८.२००५ मध्ये वरील अतिरिक्त जागा मागणी विषयावर चर्चा होवून, अतिरिक्त जागा मागणीबाबत नवीन जागा मागणी समजून शासनाकडे प्रस्ताव सादर करावा, असे ठरले. प्राधिकरण सभेत ठरल्याप्रमाणे हजरत इस्माईल शाह दर्गा और नुरानी दर्गा या मशिदीसाठी अतिरिक्त जागा देण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी शासनाकडे पूर्वमान्यतेसाठी सादर केला आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण सभा क्र.२६५, दि.२४.८.२००५ मध्ये विषय क्र. ३४ अनुषंगाने पारीत केलेला ठराव विचारात घेवून मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वस्तुस्थिती व सार्वजनिक हित पाहता, हजरत इस्माईल शाह दर्गा और नुरानी दर्गा या मशिदीसाठी १० गुंठे अतिरिक्त जागा मंजूर करण्यास पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरणाच्या भूवाटप नियमावली १९७३ च्या नियम ११ भाग-५ मधील तरतुदीनुसार "एक विशेष बाब" म्हणून मंजूरी देण्यात येत आहे.

२. रस्त्याने बाधीत जागेवर सध्या ज्या ठिकाणी मशिद व दर्गा आहे. त्याखालील क्षेत्राचे संपादनाचा विचार न करता संपूर्ण क्षेत्र महानगरपालिकेला ताब्यात देण्याच्या अटीवरच पेठ क्र. २४ मधील ५०० चौ.मी. जागा संदर्भाधीन क्र. ४ येथील नमूद आदेशान्वये यापुर्वी दिली आहे. सदर अटीचे पालन करण्याच्या अधिन राहून विषयाधीन हजरत इस्माईल शाह दर्गा और नुरानी दर्गा या मशिदीसाठी १० गुंठे जागा वाटप करण्यात यावी.

०३. मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर जागेपोटी नियमित रक्कम भरणा करुन घ्यावी, तसेच सर्व संविधानिक बाबींची पूर्तता करावी.

[ सुनील कोठेकर ]
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
२) मा.सचिव ( नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२
३) विभागीय आयुक्त, पुणे तथा अध्यक्ष पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण,निगडी,पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण,निगडी,पुणे
५) कक्ष अधिकारी (संगणक शाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
६) निवडनस्ती (नवि-२२)